**अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्यास**
**मुदतवाढ देणेबाबत -**
**जिल्हा व सत्र न्यायालय नागपूर ,**
**दिनांक ०१ मार्च, २०२३ ते ३१ ऑगस्ट, २०२३**
**या कालावधीसाठी...**

# महाराष्ट्र शासन
## विधि व न्याय विभाग
### शासन निर्णय क्रमांकः पदनि २०२३/प्र.क्र.३७/का.१२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १० मार्च, २०२३

**वाचा -**

१ शासन निर्णय विधि व न्याय विभाग क्रमांकः एचसीटी १००२/१२८९/(१६२)/नऊ / चार, दिनांक ०८.०९.२००३
२ शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकः पदनि २०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दिनांक ०८ फेब्रुवारी, २०२३
३ शासन निर्णय विधि व न्याय विभाग क्रमांकः पदनि २०२२/प्र.क्र.४६/का.१२, दिनांक ०८ सप्टेंबर, २०२२
४ शासन निर्णय विधि व न्याय विभाग क्रमांक : सीआरसी २११७/प्र.क्र.१७४/का.१२, दिनांक १५ नोव्हेंबर, २०२२
५ प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, जिल्हा व सत्र न्यायालय नागपूर यांचे पत्र क्रमांक B-४(१०)/७०६/२०२३, दिनांक १८ फेब्रुवारी, २०२३

**शासन निर्णय-**

संदर्भाधीन दिनांक ०८ सप्टेंबर, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये जिल्हा व सत्र न्यायालय नागपूर यांच्या आस्थापनेवरील १४२ अस्थायी पदांना दिनांक २८ फेब्रुवारी, २०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. संदर्भाधीन दिनांक १५ नोव्हेंबर, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये रामटेक जिल्हा नागपूर येथे दिवाणी न्यायालय वरिष्ठ स्तर स्थापन करण्यास व या न्यायालयासाठी पदनिर्मिती करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. संबंधित न्यायालयांचे कामकाज सुरळीत सुरु राहण्यासाठी खाली दर्शविलेल्या तक्त्यात नमूद केल्यानुसार १४६ अस्थायी पदांना दिनांक ०१ मार्च, २०२३ ते ३१ ऑगस्ट, २०२३ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | दिनांक २८.०२.२०२३ पर्यंत मुदतवाढ दिलेली पदे | दिनांक ०१.०३.२०२२ ते २८.०२.२०२३ या कालावधीत नव्याने निर्माण केलेली पदे | पदनिर्मितीचा शासन निर्णय क्रमांक व दिनांक | दिनांक ०१.०३.२०२३ पासून ३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ द्यावयाची पदे |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | अधिक्षक | २ | १ | | ३ |
| २ | सहायक अधिक्षक | १२ | १ | | १३ |
| ३ | लघुलेखक उच्चश्रेणी | १ | ० | | १ |
| ४ | लघुलेखक निम्नश्रेणी | २८ | ० | | २८ |
| ५ | लघुलेखक वर्ग २ | १ | १ | | २ |
| ६ | वरिष्ठ लिपिक | १६ | ० | | १६ |
| ७ | कनिष्ठ लिपिक | ३७ | ० | | ३७ |
| ८ | टंकलेखक | १ | ० | | १ |
| ९ | लिपिक | १ | ० | | १ |
| १० | बेलिफ | १५ | १ | | १६ |
| ११ | वाहनचालक | ३ | ० | | ३ |
| १२ | उदकी | ४ | ० | | ४ |
| १३ | सफाईगार | १ | ० | | १ |
| १४ | पहारेकरी | १ | ० | | १ |
| १५ | शिपाई | १६ | ० | | १६ |
| १६ | शिपाई बाह्ययंत्रणेद्वारे | २ | ० | | २ |
| १७ | सफाईगार बाह्ययंत्रणेद्वारे | १ | ० | | १ |
| | एकूण | १४२ | ४ | | १४६ |

२. विधि व न्याय विभाग कार्यासन ९ यांचेकडून मुदतवाढ मिळणारी पदे या शासन निर्णयातून वगळली आहेत.

३. यासाठी येणारा खर्च "२०१४-न्यायदान" या मुख्य लेखाशीर्षाखाली १०५ (दोन) जिल्हा व सत्र न्यायाधिश", "१०५-(तीन) दिवाणी न्यायाधिश" व "१०८ फौजदारी न्यायालये" यांपैकी योग्य त्या

लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या लेखाशीर्षाखालील संबंधित वित्तिय वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ नुसार वित्तिय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग तीन मधील अ.क्र. ४ चा परिच्छेद क्र.२७(२) (क) अन्वये तसेच, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०८ फेब्रुवारी, २०२३ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१०१९०४३३८९१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BHAGYASHREE RAJENDRA BHAIDKAR

Digitally signed by BHAGYASHREE RAJENDRA BHAIDKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=d567849462918ceb7579bb2b56247e927c039bbdf028022a8b9ce837a7c854bb, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=FB84FEFEFE4EE219C1BC35B35201C14EAB0903E8194A7413A74EED93F32AFDB0, cn=BHAGYASHREE RAJENDRA BHAIDKAR
Date: 2023.03.10 19:08:35 +05'30'

**( भाग्यश्री भाईडकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय मुंबई,
२. प्रबंधक (निरीक्षणे-१), मा.उच्च न्यायालय मुंबई,
३. प्रबंधक, मा.उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ नागपूर, औरंगाबाद
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-एक, महाराष्ट्र मुंबई,
५. महालेखापाल (लेखापरीक्षा) एक, महाराष्ट्र मुंबई,
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) दोन, महाराष्ट्र नागपूर,
७. महालेखापाल (लेखापरीक्षा) दोन, महाराष्ट्र नागपूर,
८. सह सचिव, विधि व न्याय विभाग, नागपूर, औरंगाबाद,
९. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, नागपूर,
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,
११.उप कोषागार अधिकारी, नागपूर,
१२. वित्त विभाग, आ.पु.क., व्यय-५, अर्थसंकल्प ११, मंत्रालय, मुंबई
१३.विधि व न्याय विभाग, कार्यासन २३ व २४,
१४.निवडनस्ती (का.१२).